**मंत्र्यांचा दर्जा दिलेल्या व्यक्तींनी आयोजित केलेल्या बैठकांना शासकीय अधिकाऱ्यांनी उपस्थित न राहण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०११/प्र.क्र.६९/१८ (र.व का.),
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ८ ऑगस्ट, २०११.

वाचा :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.१२८/ १०/१८ (र.व का.), दिनांक १० मे २०११

## परिपत्रक

मंत्र्याचा दर्जा दिलेल्या अशासकीय व्यक्तींनी आयोजित केलेल्या बैठकांना शासकीय अधिकाऱ्यांनी उपस्थित न राहण्याबाबत संदर्भाधीन शासन परिपत्रक, दिनांक १० मे २०११ अन्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. या संदर्भात वैधानिक विकास मंडळाकडून सदर परिपत्रकातील सूचना हया मंडळाने बोलाविलेल्या बैठकीकरिता देखील लागू होतील किंवा कसे याबाबत विचारणा केलेली आहे. सदर परिपत्रकातील बैठकीच्या सूचनांसंदर्भात पुढीलप्रमाणे खुलासा करण्यात येत आहे:-

अधिनियम, नियमान्वये अशासकीय सदस्यांना शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना बैठकीसाठी बोलाविण्याचे अधिकार दिले असतील तर उपरोक्त दि.१० मे २०११ च्या परिपत्रकातील सूचना अशा प्रकरणी लागू होणार नाहीत. त्याचप्रमाणे शासनाने गठीत केलेल्या समित्यांच्या बैठकीकरिता हया सूचना लागू रहाणार नाहीत.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८०८१५३०५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( नंदकुमार जंत्रे )
सचिव (प्र.सु,र.व का.)

प्रति,

सर्व सन्माननीय संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य, (कृ.मा.प.)

राज्यपालांचे सचिव (५प्रती)
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५प्रती)
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव (५प्रती)
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
मुख्य सचिवांचे कार्यालय,
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (१० प्रती)
*मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांनी त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभागप्रमुख / कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास वरील बाब आणावी.)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई, (५प्रती)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.
*पत्राने